जवाहर नवोदय विद्यालय, घोट ता. चामोर्शी
जि. गडचिरोली येथील वन विभागाच्या जमीनीचा
मोबदला रु. १,९६,१४,७५६/- अदा करणेबाबत..

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः जनोवि-२०२१/प्र.क्र.१७९/२१/एसएम-६**
मादाम कामा रोड, मंत्रालय, विस्तार भवन
मुंबई-४०००३२
दिनांक:- २१ मार्च २०२२

वाचा :-

१) जिल्हाधिकारी, गडचिरोली यांचे अ.शा. पत्र क्र. १४१६/अ.का./जमीन-१/२०२० दि. ९/११/२०२०.
२) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थस-२०२१/प्र.क्र. ४८/अर्थ-३ दि. ६/०४/२०२१.
३) शासन निर्णय वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि. २४/६/२०२१.
४) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. पूरक-२०२१/प्र.क्र. १०६/अर्थ-३ दि. ३/०१/२०२२.
५) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०२१/प्र.क्र.४८/अर्थ-३ दि. ३/०२/२०२२.

**प्रस्तावना :-**

मौजे घोट ता. चामोर्शी जिल्हा गडचिरोली येथील स.नं. ३६८ आराजी १२.०० हे. आर. जमीनीचा ताबा जवाहर नवोदय विद्यालय घोट, ला दिनांक ०४/०१/१९८८ रोजी देण्यात आला असुन त्या जागेवर जवाहर नवोदय विद्यालय घोट, टप्पा-१ चे काम पुर्ण होवून शाळा सुरु आहे. सदर जमीन अभिलेखानुसार वनजमीन असल्याने जागा मंजुरीकरीता वनसंवर्धन कायदा १९८० च्या तरतुदी लागु होतात. जवाहर नवोदय विद्यालय केंद्र शासनाच्या अखत्यारीतील असले तरीही या शाळेकरीता जमीन राज्यशासनाने विनामुल्य उपलब्ध करुन द्यावयाची आहे. जवाहर नवोदय विद्यालयाच्या टप्पा -१ चे बांधकाम पूर्ण झाले असुन टप्पा-२ बांधकाम , शिक्षकांचे निवासस्थान बांधकाम, कंपाऊंड वॉल चे बांधकाम पूर्ण होण्याच्या दृष्टीने वन विभागाच्या जमीनीसाठी ना-हरकत प्रमाणपत्र देण्याकरीता वन विभागाने केलेल्या मागणीनुसार जिल्हाधिकारी, गडचिरोली यांनी संदर्भ क्र. १ येथील पत्रान्वये शासनाकडे रु. १,९६,१४,७५६/- इतक्या रकमेची मागणी केली आहे. या अनुषंगाने जवाहर नवोदय विद्यालय, घोट ता. चामोर्शी जि. गडचिरोली येथील वन विभागाच्या जमीनीचा मोबदला मंजुर करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

जवाहर नवोदय विद्यालय, घोट, ता. चामोर्शी जि. गडचिरोली येथील स.नं. ३६८ आराजी १२.०० हे. आर. वन विभागाच्या जमीनीचा वन विभागाने मागणी केलेला मोबदला अदा करण्यासाठी रु. १,९६,१४,७५६/- (रुपये एक कोटी शहान्नव लक्ष चौदा हजार सातशे छप्पन फक्त) इतकी रक्कम वितरीत करण्यास याद्वारे मान्यता देण्यात येत आहे.

०२. सदर खर्च मागणी क्रमांक ई-२,२२०२, सर्वसाधारण शिक्षण, ०२ माध्यमिक शिक्षण, १०९, शासकीय माध्यमिक शाळा, (००) (०२) मुलांसाठी व मुलींसाठी शासकीय माध्यमिक शाळा-नवोदय विद्यालय (२२०२०४३१) (कार्यक्रम) या लेखाशीर्षाखाली सन २०२१-२०२२ या आर्थिक वर्षात पूरक मागणीद्वारे उपलब्ध तरतुदीमधुन भागविण्यात यावा, सदर निधी वितरीत करण्यासाठी आयुक्त शिक्षण, महाराष्ट्र राज्य पूणे यांना नियंत्रक अधिकारी म्हणून व शिक्षणाधिकारी (माध्यमिक ) जिल्हापरिषद, गडचिरोली यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषीत करण्यात येत आहे.

०३. प्रस्तुत शासन निर्णयाद्वारे वितरीत करण्यात आलेला निधी विहीत प्रयोजनासाठीच वापरण्यात यावा, सदर निधीचा विनियोग करतांना वित्त विभागाच्या संदर्भ क्र. २ ते ५ येथील आदेशान्वये वेळोवेळी निर्गमीत सुचनांचे, वित्तीय नियमावली व कार्यपध्दतीचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

०४. सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. ५०/१४७१ दिनांक ०८/०२/२०२२ व वित्त विभागाच्या अनौ. संदर्भ क्र. १६९/२०२२/व्यय-५ दिनांक ०९/०२/२०२२ अन्वये प्राप्त मान्यतेनुसार निर्गमीत करण्यात येत आहे.

०५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेत स्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०२२०३२११५०५२४६०२१ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Digitally signed by Sameer Anant Sawant
Date: 2022.03.21 15:07:25 +05'30'

**( समीर सावंत )**
**उप सचिव,महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मंत्री, शालेय शिक्षण, यांचे खाजगी सचिव.
२) मा.राज्यमंत्री, शालेय शिक्षण, यांचे खाजगी सचिव.
३) अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग, यांचे स्वीय सहायक.
४) आयुक्त,शिक्षण, महाराष्ट्र राज्य, पुणे
५) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
६) शिक्षण संचालक (प्राथमिक), महाराष्ट्र राज्य, पुणे.
७) विभागीय शिक्षण उपसंचालक, नागपूर विभाग, नागपूर
८) शिक्षणाधिकारी (माध्यमिक), जिल्हा परिषद, गडचिरोली.
९) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र -२, नागपूर

१०) महालेखापाल (लेखापरीक्षा), महाराष्ट्र -२, नागपूर
११) जिल्हा कोषागार अधिकारी, गडचिरोली
१२) प्राचार्य, जवाहर नवोदय विद्यालय, घोट ता. चामोर्शी जि. गडचिरोली
१३) अवर सचिव/कक्ष अधिकारी, नियोजन विभाग (का १४७१) मंत्रालय, मुंबई.
१४) अवर सचिव/कक्ष अधिकारी, वित्त विभाग (व्यय-५), मंत्रालय, मुंबई.
१५) अवर सचिव, अर्थसंकल्प शाखा, शालेय शिक्षण व क्रिडा विभाग, मुंबई.
१६) निवड नस्ती (एस एम -६)